सहायक प्राध्यापक, पदार्थविज्ञान, शासकिय अभियांत्रिकी महाविद्यालय, महाराष्ट्र अभियांत्रिकी महाविद्यालय शिक्षक सेवा गट-अ (क) या पदावर सरळसेवेने नियुक्तीबाबत.

महाराष्ट्र शासन
उच्च व तंत्र शिक्षण विभाग
शासन निर्णय क्रमांकः उवतंशि/तांशि -१/३३/१४/११०/२०१३
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक -: ०३ एप्रिल, २०१७

पहा:- १) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पत्र क्र. १५(२)(१४)/१७५१६/सात-अ, दि.१४.०६.२०१६
२) सामान्य प्रशासन विभाग यांचे शासन परिपत्रक क्र. एसआरव्ही-२०१५/ प्र.क्र. १५६/कार्या-१२, दि.८/०५/२०१५

**शासन निर्णय-:**

महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत खालील उमेदवाराची सहायक प्राध्यापक, पदार्थविज्ञान, शासकिय अभियांत्रिकी महाविद्यालय, महाराष्ट्र अभियांत्रिकी महाविद्यालय शिक्षक सेवा गट-अ (क) या पदावर संदर्भाधिन क्र. ०२ येथीलदि.०८/०५/२०१५ च्या शासन परिपत्रकानुसार त्यांच्या नावासमोर रकाना क्र. ६ येथे दर्शाविलेल्या ठिकाणी ते ज्या दिनांकास त्यांच्या पदाचा कार्यभार स्विकारतील त्या दिनांकापासून दोन वर्षाच्या परिविक्षा कालावधीसाठी स्थानापन्न नियुक्ती करण्यात येत आहे.

| अ. क्र. | गुणवत्ता क्रमांक | आयोग पुरस्कृत उमेदवाराचे नांव | वर्गवारी | आयोगाने शिफारस केलेला प्रवर्ग | नियुक्तीचे ठिकाण |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | १ | श्री. नन्नावरे अनिल अर्जुन | अ.ज. | अ.ज. | शासकिय अभियांत्रिकी महाविद्यालय कराड. |

०२. उपरोक्त उमेदवारांस संबंधित वैद्यकीय मंडळाने वैद्यकीय दृष्ट्या शासकीय सेवेसाठी पात्र ठरविले आहे.तसेच त्यांचा चारित्र्य पडताळणी अहवाल देखील प्राप्त झाला आहे. तशी नोंद त्यांच्या सेवा पुस्तकात घेण्यात यावी.

०३. उपरोक्त उमेदवाराची, सहायक प्राध्यापक, पदार्थविज्ञान, शासकिय अभियांत्रिकी महाविद्यालय, महाराष्ट्र अभियांत्रिकी महाविद्यालय शिक्षक सेवा गट-अ या पदावर ते प्रत्यक्ष हजर झाल्याच्या दिनांकापासून, नामनिर्देशनाने, निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून नियुक्ती करण्यात येत आहे :-

१) सदर उमेदवाराची वेतनश्रेणी रु. १५,६००-३९,१००/- या पे बँड व उच्च व तंत्रशिक्षण विभाग शासन निर्णय क्र. एसपीसी-२०१०/(३४/१०)/तांशि- २, दि. २०/०८/२०१० मध्ये नमुद एजीपी मध्ये राहील.

२) सदर वेतनश्रेणीव्यतिरिक्त शासन वेळोवेळी ठरवेल त्या दराने महागाई भत्ता, घरभाडे भत्ता व स्थानिक पूरक भत्ता अनुज्ञेय राहील.

३) सदर उमेदवारास प्रथम वेतनवाढ परिविक्षा कालावधीतील एक वर्ष पूर्ण झाल्यानंतर देण्यात येईल व त्यानंतरची वेतनवाढ परिविक्षा कालावधी समाधानकारकरीत्या पूर्ण केल्यानंतर मिळेल.

४) सदर उमेदवाराचे परिविक्षा कालावधीतील काम किंवा वर्तणूक अयोग्य, अपेक्षित दर्जाची नसल्यास अथवा असमाधानकारक आढळल्यास त्यांची सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यात येईल, अथवा सेवेतून कमी करण्यास ते पात्र ठरतील.

५) सदर उमेदवाराची नियुक्ती सरळ सेवाप्रवेश नियुक्तीसाठी विहीत केलेल्या नियमाच्या अधीन राहून ते यापूर्वी हिंदी व मराठी भाषेच्या परीक्षा उत्तीर्ण झालेले नसल्यास किंवा त्या परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसल्यास त्या परीक्षा त्यांना विहीत मुदतीत उत्तीर्ण होणे आवश्यक आहे. तसे न झाल्यास त्यांची वेतनवाढ रोखून ठेवण्यात येईल.

६) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. प्रशिक्षण-२०००/प्र.क्र.६१/२००१/३९, दि. ७/८/२००० अन्वये शासन सेवेतील नियुक्तीकरीता संगणक हाताळणी / वापराबाबतचे ज्ञान एक आवश्यक अर्हता म्हणून निश्चित करण्यात आली आहे. त्यानुसार शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.प्रशिक्षण २०००/प्र.क्र.६१/ २००१/३९, दि. १९/३/२००३ अन्वये आवश्यक प्रमाणपत्र नियुक्ती आदेशाच्या दिनांकापासून दोन वर्षाच्या आत उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. जर त्यांनी विहीत मुदतीत प्रमाणपत्र उपलब्ध करुन दिले नाही तर उक्त कालावधी संपताच त्यांची सदर पदावरील सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यात येतील.

७) सदर उमेदवाराचे वेतन महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील तरतुदीनुसार निश्चित करण्यात यावे.

८) सदर उमेदवाराने त्यांच्या नावासमोर निर्देशिलेल्या पदावर आदेशाच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत तात्काळ रुजू व्हावे. सदर विहीत मुदतीत जर त्यांनी नियुक्ती स्विकारली नाही तर आयोगाने घेतलेल्या परीक्षेत त्यांनी मिळविलेल्या गुणवत्ताक्रमानुसार त्यांना अनुज्ञेय असलेली ज्येष्ठता मिळणार नाही. शिवाय प्रस्तुत नियुक्तीच्या संदर्भात त्यांनी वरील मुदतीत शासनास काहीही कळविले नाही तर, कोणतीही पूर्वसूचना न देता त्यांच्या नियुक्तीचे सदरचे आदेश रद्द करण्यात येतील.

९) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. अनियो -१००९/ प्रक्र ३२/ सेवा ४ दि. १८.०८.२००९ मधील तरतूदीनुसार दि. १ नोव्हेंबर २००५ पूर्वी शासन सेवेत निवृत्तीवेतनार्ह आस्थापनेच्या पदावरील नियुक्तीसाठी दि. १ नोव्हेंबर २००५ पूर्वी किंवा त्यानंतर अर्ज केला असेल आणि त्याला दि. १ नोव्हेंबर

२००५ रोजी किंवा त्यानंतर नवीन पदावर नियुक्त करण्यात आले असेल तर अशा प्रकरणी शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अनियो १००६/८७/ सेवा ४ दि. १२.०१.२००७ (i) ते (iv) येथे नमूद केलेल्या सर्व अटींची पूर्तता झाल्यास संबंधित शासकीय कर्मचा-यास महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन१९८२) व सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना लागू ठरतील. दि. १८.०८.२००९ च्या परिपत्रकात (i) ते (iv) येथील सर्व अटींची पूर्तता ज्या प्रकरणी होत नसेल, अशा शासकीय कर्मचा-यांना नवीन राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजना लागू ठरतील.

१०) सदर उमेदवारांचे सेवानिवृत्तीचे वय प्रचलित नियमानुसार राहील.

११) उमेदवारास नियुक्तीच्या ठिकाणी उपस्थित राहण्यासाठी प्रवासभत्ता देण्यात येणार नाही.

१२) सदर उमेदवाराने नोकरी सोडण्यापूर्वी शासनास एक महिन्याची पूर्वसूचना देणे अथवा एक महिन्याचे वेतन देणे आवश्यक आहे.

०४. सदर नियुक्ती उमेदवाराने सादर केलेल्या प्रमाणपत्रांच्या सत्यासत्यतेवर अवलंबुन राहील. सदर प्रमाणपत्र नियुक्तीनंतर खोटे अथवा बनावट आढळल्यास सदर उमेदवाराची नियुक्ती आपोआप संपुष्टात येईल.

०५. हे आदेश प्राप्त होताच संबधित उमेदवाराने नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व त्याबाबतचा अहवाल संबधित संस्थाप्रमुखाकडे सादर करावा. संस्थाप्रमुखांनी त्याबाबतचा अहवाल संचालकामार्फत शासनास सादर करावा.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०४०३१५५५००४६४०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sudhir Jaya Shetty

Digitally signed by Sudhir Jaya Shetty
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=72ea277025fdf5a4898b244953b82406eea05963bc456f1e1e8621e5917d8305, serialNumber=e9d37d499a521b728aeb3dc8ec38b759420308b9fd7816002b4af0ffbf1111d7, cn=Sudhir Jaya Shetty
Date: 2017.04.03 15:53:17 +05'30'

**( सुधिर ज. शेट्टी )**
कार्यासन आधिकारी,महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) श्री. नन्नावरे अनिल अर्जुन, आनंदवन, आनंदवन स्क्वेअर, आनंदनिकेतन कॉलेज, ता. वरोरा, जि. चंद्रपूर-४४२ ९१४

**प्रत ,**

१. मा. मंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

२. अ. मु. सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.

३. संचालक, तंत्रशिक्षण, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

४. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राव्दारे).

५. सहसंचालक तंत्र शिक्षण, विभागीय कार्यालय, पुणे

६. प्राचार्य, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, कराड (उमेदवारास रुजू करुन घेताना त्यांच्या शैक्षणीक तसेच इतर मूळ प्रमाणपत्रांची तपासणी करुन संस्थाप्रमुखांनी स्वत: खात्री करावी व त्याबाबतचा अहवाल संचालक, तंत्रशिक्षण, मुंबई यांच्यामार्फत शासनास तात्काळ सादर करावा.)

७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र-२, मुंबई

८. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे

९. निवड नस्ती (तांशि-१).